महाराष्ट्र ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत सुरू असणाऱ्या ई-गव्हर्नन्स प्रकल्पांसाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांच्या सेवांचे देयक अदा करण्यासाठी येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.९७ /मातंक

बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ
फोर्ट,मुंबई-४००००१
तारीख: २० डिसेंबर,२०१८

वाचा-

१) **दि.६/१२/२०१८ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त**

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अस्मिता प्रकल्प, अस्मिता बाजार, ई-सरस व यलो-रिव्होलुशन हे प्रकल्प राबविण्यात येत आहेत. या विभागाच्या दि. २०.०६.२०१८ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत निर्णय झाल्यानुसार उपरोक्त ई-गव्हर्नन्स प्रकल्पांकरिता मे. केपीएमजी व मे. विप्रो या कंपन्यांचे सल्लागार माहे ऑगस्ट/सप्टेंबर,२०१८ पासून कार्यरत आहेत. महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान या कार्यालयाकडून सदर सल्लागारांचे देयक अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. त्यानुसार महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान या कार्यालयास सल्लागार सेवांचे देयक अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहेत-

**शासन आदेश-**

महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अस्मिता प्रकल्प, अस्मिता बाजार, ई- सरस व यलो रिव्होल्यूशन हे ई- गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यात येत आहेत. सदर प्रकल्पांसाठी मे. केपीएमजी व मे. विप्रो या कंपन्यांचे सल्लागार कार्यरत आहेत. सदर सल्लागारांच्या माहे ऑगस्ट/सप्टेंबर,२०१८ ते माहे मार्च, २०१९ पर्यंतच्या सेवांच्या देयकांची एकूण रू.१,९६,३७,८१८/- (रु. एक कोटी शहाण्णव लाख सदोतीस हजार आठशे अठरा फक्त) इतकी रक्कम ई-गव्हर्नन्स या लेखाशीर्षाखालील तरतूदीतून उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव समितीसमोर ठेवण्यात आला, सदर प्रस्तावास समितीने मान्यता दिली आहे.

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीची वरीलप्रमाणे मान्यता विचारात घेऊन महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान या कार्यालयास सल्लागार सेवांचे देयक अदा करण्यासाठी येणाऱ्या

रू.१,९६,३७,८१८/- (रु. एक कोटी शहाण्णव लाख सदोतीस हजार आठशे अठरा फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

३. त्यानुसार सदर निधी उपसंचालक, लेखा व वित्त , महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरित करण्यात यावा. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती यांनी सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. सदर खर्च "लेखाशिर्ष ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)- ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१ २८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध झालेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन आदेश वित्त विभाग, क्रमांक: विअप्र- २०१३ /प्र.क्र.३० /२०१३ /विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्ठातील भाग पहिला, उपविभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक-७६, अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२०१३०१२९२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saroj Rajesh Deshpande

Digitally signed by Saroj Rajesh Deshpande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a31a46110f5bc3d6fc7bdf1d6619a227d04e20859a66b7faddf9190ac096802, cn=Saroj Rajesh Deshpande
Date: 2018.12.21 18:25:06 +05'30'

**(सरोज रा. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
२. उप सचिव,(रोखशाखा/ केंद्रिय योजना),ग्रामविकास विभाग, मंत्रालय.मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान,नवी मुंबई.
४. उपसंचालक, लेखा व वित्त , महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई.
५. कक्ष अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी (रोख शाखा), ग्रामविकास विभाग,मंत्रालय.मुंबई
६. निवड नस्ती व बजेट नस्ती ( माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्रामविकास विभाग , मंत्रालय.मुंबई